ATP वर्ल्ड टूर २५० सिरिज अंतर्गत "महाराष्ट्र ओपन" टेनिस स्पर्धेसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: क्रीस्पर्धा ३२२३/प्र.क्र.३१/क्रीयुसे-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०२३

**वाचा:-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.बैठक २०१७/प्र.क्र.८५/क्रीयुसे-२, दि.१५ जुलै, २०१७

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दिपत्रक क्र.बैठक २०१७/प्र.क्र.८५/क्रीयुसे-२, दि.२२.१२.२०२२

३. वित्त विभाग शासन परिपत्रक, क्र.अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३

**प्रस्तावना:-**

ATP वर्ल्ड टूर २५० सिरिज या स्पर्धेचे आयोजन महाराष्ट्र शासन व महाराष्ट्र राज्य लॉन टेनिस असोसिएशन यांच्या संयुक्त विद्यमाने "महाराष्ट्र ओपन" या नावाने आयोजित करण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दि.१५.०७.२०१७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक २ येथे नमूद शासन शुध्दिपत्रक क्र.२ अन्वये, या स्पर्धा प्रथमतः ५ वेळा आयोजित करण्याचे नियोजन करण्यात यावे, अशी सुधारणा करण्यात आली आहे.

सन २०२२-२३ मध्ये या स्पर्धेचे आयोजन शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे येथे दि.३१.१२.२०२२ ते दि.०६.०१.२०२३ या कालावधीमध्ये करण्यात आले होते. सदर स्पर्धेसाठी झालेल्या खर्चाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

ATP वर्ल्ड टूर २५० सिरिज अंतर्गत सन २०२२-२३ मध्ये दि.३१.१२.२०२२ ते दि.०६.०१.२०२३ या कालावधीमध्ये "महाराष्ट्र ओपन" या टेनिस स्पर्धेच्या आयोजनासाठी झालेल्या एकूण खर्चापैकी रू.२००.०० लक्ष (अक्षरी रूपये दोन कोटी फक्त) इतका खर्च देण्यास आणि सदर निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम आयुक्त (क्रीडा व युवक सेवा) यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर देयक कोषागारात सादर करून रू.२०० लक्ष (अक्षरी रूपये दोन कोटी फक्त) इतक्या रकमेचा धनादेश महाराष्ट्र राज्य लॉन टेनिस असोसिएशन यांच्या नावाने काढून त्यांना तो पोचपावती घेऊन द्यावा.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.०३, २२०४- क्रीडा व युवक सेवा १०४-क्रीडा व खेळ (०२) क्रीडा स्पर्धा (०२) (०३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहाय्यक अनुदान (२२०४ १९४३) (राज्य), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून

भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाने शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ अन्वये निधी वितरणाबाबत दिलेल्या अटी व सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. यासाठी संबंधित उपसंचालक व लेखाधिकारी (क्रीडा व युवक सेवा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा व युवक सेवा) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.११८/१४७१, दि.१७.०३.२०२३ अन्वये आणि वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं ५३५/व्यय५, दि.३०.०५.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२११८२३२१३२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.06.21 18:24:51 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६) मा.विधानसभा/ विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
७) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
९) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२ महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
११) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र- १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८ /नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
१६) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७) निवड नस्ती (क्रीयुसे-२).